# वेगवेगळे प्रयोग कर... टेन्शन घेऊ नकोस

## अरविंद गुप्तांचा विद्यार्थ्याला सल्ला ; आयुकात सत्कार

**पुणे, ता. ८ :** सर, माझे पाढे पाठ होत नाहीत... मी काय करू? असा प्रश्न एका लहान मुलाने काकुळतीने शास्त्रज्ञ अरविंद गुप्तांना विचारला आणि त्यावर पाढे पाठ करायची गरज नाही... मस्त खेळ, मजा कर.. वस्तूंची मोडतोड कर. वेगवेगळे प्रयोग कर.. टेन्शन घेऊ नकोस... असं गुप्तांनी त्या मुलाला सांगितलं आणि तो मुलगा पाढ्यांचं टेन्शन विसरून बागडायला लागला. इतरही अनेक मुलं अरविंद गुप्तांना अगदी बिलगून आपले प्रश्न विचारत होती. त्यांच्यासोबत फोटो, ऑटोग्राफ घेत होती. लहान मुलंच नाही तर मोठ्यानीही गुप्तांसोबत फोटो घेतले. विज्ञान, शिक्षण क्षेत्रात जवळपास चाळीस वर्षे अत्यंत सृजनात्मक काम करणाऱ्या माणसाला भेटल्याचा आनंद प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होता.

पद्मश्री पुरस्कारानिमित्त गुप्ता यांच्या सत्काराचा आणि भाषणाचा कार्यक्रम पुण्यातील 'आयुका'त झाला. अरविंद गुप्तांना ऐकण्यासाठी प्रचंड गर्दी झाली होती. लहान मुलांची संख्या लक्षणीय होती.

Sakal, June 09, 2018, Pp. 02